**स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत तालुकास्तरावरील कायम स्वरुपी विक्री केंद्राचे बांधकामासाठी लागणारा <u>अतिरिक्त निधी .....</u>**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**

**शासन परिपत्रक** क्रमांक : अर्थसं-२००९/प्र.क्र.८७२अ/योजना-१

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांक : १६ जानेवारी, २०१०

<u>वाचा:</u>

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पणन-२००८/प्र.क्र.७३८/यो-१ दिनांक:२७ फेब्रुवारी,२००९.

२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र. अर्थसं-२००९/ प्र.क्र.८७२अ/ योजना-१, दिनांक ११ ऑगस्ट,२००९.

३. शासन परिपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. अर्थसं-२००९/ प्र.क्र.८७२अ/ योजना-१, दिनांक ३० ऑक्टोबर, २००९.

**<u>परिपत्रक</u>**

स्वयंसहाय्यता बचत गट/ स्वरोजगारी यांच्या उत्पादित मालाला कायमस्वरुपी बाजारपेठ मिळावी याकरिता तालुका व जिल्हास्तरावर कायमस्वरुपी विक्री केंद्रे बांधण्याचा शासनाने निर्णय घेतलेला असून, संदर्भाधीन दिनांक ११ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ८ जिल्हे व ७७ तालुक्यांना अनुक्रमे प्रत्येकी रुपये ५०.०० लक्ष व रु. २५.०० लक्ष याप्रमाणे एकूण रु. २३२५.०० लक्ष एवढा निधी बांधकामासाठी अनुदान स्वरुपात वितरीत करण्यात आला आहे. तसेच दिनांक ११ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयासोबत, तालुका विक्री केंद्रांच्या बांधकामासाठी रु. २५.०० लक्ष इतक्या अंदाजित रकमेचा Type Plan जोडून दिलेला असून, त्याप्रमाणे आराखडा तयार करून तालुका विक्री केंद्रांचे बांधकाम तातडीने पूर्ण करण्याच्या सूचनादेखिल संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३०.१०.२००९ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित केल्या आहेत.

२. Type Plan नुसार तालुका विक्री केंद्रांच्या बांधकामाबाबतचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले असता ते रु. २५.०० लक्षच्या मर्यादेत बसत नाही व अंदाजित खर्चाची रक्कम जास्त होते असे काही जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे. या बाबीचा साकल्याने विचार करता याद्वारे अशा सूचना देण्यात येत आहेत की, तालुका केंद्रांसाठी विहित करण्यात आलेल्या रु.२५.०० लक्षच्या मर्यादेत बांधकाम पूर्ण होणार नसल्यास, बांधकामावर होणारा वाढीव खर्च स्वर्णजयंती ग्रामस्वरोजगार योजनेखालील मूलभूत सुविधांसाठी असलेल्या निधीतून जास्तीतजास्त रु.२०.०० लक्ष च्या

**स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत तालुकास्तरावरील कायम स्वरुपी विक्री केंद्राचे बांधकामासाठी लागणारा <u>अतिरिक्त निधी .....</u>**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक** क्रमांक : अर्थसं-२००९/प्र.क्र.८७२अ/योजना-१
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांक : १६ जानेवारी, २०१०

<u>वाचा:</u>

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पणन-२००८/प्र.क्र.७३८/यो-१ दिनांक:२७ फेब्रुवारी,२००९.
२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र. अर्थसं-२००९/ प्र.क्र.८७२अ/ योजना-१, दिनांक ११ ऑगस्ट,२००९.
३. शासन परिपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. अर्थसं-२००९/ प्र.क्र.८७२अ/ योजना-१, दिनांक ३० ऑक्टोबर, २००९.

**<u>परिपत्रक</u>**

स्वयंसहाय्यता बचत गट/ स्वरोजगारी यांच्या उत्पादित मालाला कायमस्वरुपी बाजारपेठ मिळावी याकरिता तालुका व जिल्हास्तरावर कायमस्वरुपी विक्री केंद्रे बांधण्याचा शासनाने निर्णय घेतलेला असून, संदर्भाधीन दिनांक ११ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ८ जिल्हे व ७७ तालुक्यांना अनुक्रमे प्रत्येकी रुपये ५०.०० लक्ष व रु. २५.०० लक्ष याप्रमाणे एकूण रु. २३२५.०० लक्ष एवढा निधी बांधकामासाठी अनुदान स्वरुपात वितरीत करण्यात आला आहे. तसेच दिनांक ११ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयासोबत, तालुका विक्री केंद्रांच्या बांधकामासाठी रु. २५.०० लक्ष इतक्या अंदाजित रकमेचा Type Plan जोडून दिलेला असून, त्याप्रमाणे आराखडा तयार करून तालुका विक्री केंद्रांचे बांधकाम तातडीने पूर्ण करण्याच्या सूचनादेखिल संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३०.१०.२००९ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित केल्या आहेत.

२. Type Plan नुसार तालुका विक्री केंद्रांच्या बांधकामाबाबतचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले असता ते रु. २५.०० लक्षच्या मर्यादेत बसत नाही व अंदाजित खर्चाची रक्कम जास्त होते असे काही जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे. या बाबीचा साकल्याने विचार करता याद्वारे अशा सूचना देण्यात येत आहेत की, तालुका केंद्रांसाठी विहित करण्यात आलेल्या रु.२५.०० लक्षच्या मर्यादेत बांधकाम पूर्ण होणार नसल्यास, बांधकामावर होणारा वाढीव खर्च स्वर्णजयंती ग्रामस्वरोजगार योजनेखालील मूलभूत सुविधांसाठी असलेल्या निधीतून जास्तीतजास्त रु.२०.०० लक्ष च्या

मर्यादेत राहून करण्यात यावा. मात्र त्यापेक्षाही अधिक खर्च होणार असल्यास शासनाची पूर्व मंजूरी घेण्यात यावी. त्यानुसार आवश्यक तांत्रिक व प्रशासनीक मान्यता याबाबींची आपल्यास्तरावर पूर्तता करून घेऊन तालुका विक्री केंद्रांचे बांधकाम तातडीने पूर्ण करण्यात यावे. शासनाने पुरविलेल्या **Type Plan** प्रमाणेच बांधकाम पुर्ण करणे आवश्यक आहे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१००११६१४४९३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रि. इ. शेख)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई, / महाराष्ट्र-२, नागपूर
२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
३. सर्व जिल्हा कोषागार व उप कोषागार अधिकारी,
४. विभागीय आयुक्त, (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
६. उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)
७. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
८. अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र. योजना-३/ योजना-७ / वित्त-१
१०.निवड नस्ती, योजना-१ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.